**मुंबई मेट्रो-४ वडाळा-घाटकोपर-मुलुंड-ठाणे-कासारवडवली प्रकल्पासाठी राज्यशासनाचे दुय्यम कर्ज मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास वितरित करण्याबाबत. (सन २०२२-२३)**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२२/प्र.क्र.१५३/नवि-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २१ मार्च, २०२३.

**पहा :-**

१. नगर विकास विभाग शासन निर्णय क्र.एमआरडी-३३१६/प्र.क्र.४१/नवि-७, दिनांक २५ ऑक्टोबर,२०१६.
२. नगर विकास विभाग शासन शुध्दीपत्रक क्र.एमआरडी-३३१६/प्र.क्र.४१/नवि-७, दिनांक २१ मार्च,२०१७.
३. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र.एमआरडी-३३१७/प्र.क्र.१३८/नवि-७, दिनांक २ नोव्हेंबर, २०१८.
४. नगर विकास विभाग शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२१/प्र.क्र.११२/नवि-७, दिनांक: १० मार्च, २०२२.
५. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३ दि. ०४ एप्रिल, २०२२.
६. नगर विकास विभाग शासन परिपत्रक क्र. बीयुडी-२०२२/प्र.क्र.३७/नवि-४, दिनांक ०८ एप्रिल, २०२२.
७. समक्रमांकाचा दि. २५.०८.२०२२ रोजीचा शासन निर्णय.

**प्रस्तावना :**

मुंबई मेट्रो मार्ग ४ (वडाळा-घाटकोपर-मुलुंड-ठाणे-कासारवडवली) या प्रकल्पाच्या अंमलबजावणीस राज्य शासनाने दि. २५ ऑक्टोबर, २०१८ रोजी मान्यता दिली आहे. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यात येत आहे. सदर प्रकल्पात प्राधिकरणाचा सहभाग हा प्रकल्पाच्या स्थापत्य कामासाठी लागणारा खर्च रु.५९६१ कोटी, केंद्रीय करांच्या ५०% रु.८६७ कोटी, बांधकाम कालावधी दरम्यानचे व्याज रु.४७ कोटी व प्रणाली खर्चाच्या २०% रु.९७९ कोटी या स्वरुपात राहणार आहे. सदर प्रकल्पावरील केंद्रीय करांच्या ५०% रु.८६७ कोटी आणि राज्यशासनाचे करांकरिता रु.९९४ कोटी व प्रकल्पासाठी आवश्यक खाजगी जमिनीवरील खर्चासाठी रु.१८३२ कोटी असा एकूण रु.३,६९३ कोटी निधी राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज स्वरुपात उपलब्ध करावयाचा आहे. उपरोक्त संदर्भाधीन क्र.३ येथील दिनांक २ नोव्हेंबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये नागपूर मेट्रो व मुंबई मेट्रो मार्ग ३ प्रमाणे मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडील यापूर्वी मंत्रीमंडळाने मान्यता दिलेल्या मेट्रो २अ, २ब, ४,५,६, ७, ७अ व ९ या सर्व प्रकल्पांकरिता राज्य शासनाचे दुय्यम कर्ज हे बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून देण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर बिनव्याजी दुय्यम कर्ज सहाय्याची परतफेड प्रकल्प अंमलबजावणी संस्था म्हणून मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने करावयाची आहे.

मुंबई मेट्रो मार्ग ४ प्रकल्पासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला सन २०१८-१९ मध्ये रु.२० कोटी, सन २०१९-२० मध्ये रु.४५ कोटी, सन २०२०-२१ मध्ये रु.२२.५० कोटी, सन २०२१-२२ मध्ये रु.४२ कोटी, सन २०२२-२३ मध्ये आतापर्यंत रु.४८ कोटी असा एकूण रु.१७७.५० कोटी निधी राज्य शासनाचे बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरीत करण्यात आला आहे. मुंबई मेट्रो-४ प्रकल्पासाठी चालू वित्तीय वर्ष २०२२-२३ मध्ये राज्य शासनाचे दुय्यम कर्ज सहाय्य या प्रयोजनासाठी रु.८० कोटी इतकी तरतूद मंजूर करण्यात आली आहे. उक्त मंजूर तरतूदीमधून मुंबई मेट्रो-४ प्रकल्पासाठी रु. ३२

कोटी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

१. मुंबई मेट्रो मार्ग-४ वडाळा-घाटकोपर-मुलुंड-ठाणे-कासारवडवली प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून **रु.३२,००,००,०००/- (अक्षरी रुपये बत्तीस कोटी फक्त)** इतकी रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास प्रदान करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रक्कम मागणी क्र. एफ-७ ६२१७-नगर विकासासाठी कर्जे ६०, इतर नगर विकास योजना १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे- राज्य योजना (००) (०१) मुंबई मेट्रो-४ रेल्वे प्रकल्पाकरिता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज ५५ कर्जे व आगाऊ रकमा **सांकेतांक क्र. (६२१७०८१२)** या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ मधील मंजूर अर्थसंकल्पीत तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच उपसचिव न.वि.-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. शासन निर्णयातील परिच्छेद -१ मध्ये नमूद करण्यात आलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून काढून ती मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. नगर विकास विभागाच्या रोख शाखेने देयक तयार करुन ते अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे पाठवावे. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि- ३१ कार्यासनाने करावी.

४. राज्यशासनाकडून दुय्यम कर्जसहाय्य म्हणून वितरीत केलेली उपरोक्त रु.३२ कोटी रक्कम मुंबई मुंबई मेट्रो मार्ग ४-वडाळा-घाटकोपर-मुलुंड-ठाणे-कासारवडवली प्रकल्पासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत केंद्रीय व राज्यस्तरीय/स्थानिक कर/ खाजगी जमिनीपोटी येणाऱ्या खर्चासाठी असल्याने सदर रकमेचा विनियोग अन्य प्रयोजनासाठी करण्यात येऊ नये.

५. राज्यशासनाकडून दुय्यम कर्ज म्हणून वितरीत उपरोक्त रक्कम रु.३२ कोटी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून सदर प्रकल्पासाठी बाह्य वित्तीय संस्थाकडून घेतलेल्या मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर वसूल करावयाची आहे.

६. सदर कर्ज सहाय्याच्या रक्कमेवर भविष्यात व्याज आकारणी करण्याबाबत शासनाने निर्णय घेतल्यास कर्जाची परतफेड त्याच्या व्याजाच्या रक्कमेसह सदर प्रकल्पाचे मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर एका हप्त्यात करण्यात यावी.

७. मुंबई मेट्रो मार्ग ४ प्रकल्पाकरिता राज्यशासनाकडून केंद्रीय/ राज्यस्तरीय कर व खाजगी जमिनीपोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त झालेली रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे जमा झाल्याचे प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

८. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशिल राज्य शासन व केंद्रशासन यांना सादर करण्यात यावा.

९. सदर प्रकल्पासाठी केंद्र शासनाकडून तसेच राज्यशासनामार्फत केंद्रीय/ राज्यस्तरीय कर व खाजगी जमिनीपोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त होणाऱ्या रक्कमांसाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने स्वतंत्र लेखे ठेवावेत.

१०. राज्यशासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर कर्जसहाय्यासाठी राज्यशासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जा विषयीच्या इतर संबंधीत अटी व शर्ती लागू राहतील.

११. सदर रक्कम ज्या प्रयोजनासाठी मंजूर केली आहे ती त्याच प्रयोजनासाठी खर्च केल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी सादर करावे.

१२. सदर कर्ज सहाय्याच्या वितरणाबाबत शादिक-२०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी दिनांक ३०/१२/२०१४ मधील सूचनानुसार महाऋण आज्ञावलीत **जोडपत्र-अ** (सोबत जोडले आहे) नुसार माहिती भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

१३. राज्य शासनाकडून मुंबई मेट्रो-४ प्रकल्पाकरीता आतापर्यंत रु.१७७.५० कोटी इतका निधी दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून वितरीत करण्यात आला आहे. सदर आदेशान्वये वितरीत होणाऱ्या निधीनंतर एकूण वितरीत निधीची परिस्थिती खालील प्रमाणे :-

| **अनु.क्र.** | **दिनांक** | **रक्कम** | **निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव** | **एकूण वितरीत निधी (रु.कोटी)** |
|---|---|---|---|---|
| १ | २६.०३.२०१९ | २०.०० | राज्य शासन | २०.०० |
| २ | १८.०३.२०२० | २७.०० | राज्य शासन | ४७.०० |
| ३ | २७.०३.२०२० | १८.०० | राज्य शासन | ६५.०० |
| ४ | ०४.०३.२०२१ | २२.५० | राज्य शासन | ८७.५० |
| ५ | १०.०३.२०२२ | ४२.०० | राज्य शासन | १२९.५० |
| ६ | २५.०८.२०२२ | ४८.०० | राज्य शासन | १७७.५० |
| ७ | सदरचे वितरण | ३२.०० | राज्य शासन | २०९.५० |

१४. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३ दि. ०४ एप्रिल, २०२२ सोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

१५. सदर निधी वितरण आदेश नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.३०/का.१४४४ दि.२७.०२.२०२२ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.९०/व्यय-३ दिनांक २०.०३.२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

१६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२११२५४३४०५२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.03.21 19:28:46 +05'30'

**[विजय चौधरी]**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
४. सचिव, शहरी विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.

५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
९. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
१०. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
११. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३. वित्त विभाग कार्यासन- व्यय-३, अर्थसंकल्प-१६, अर्थसंकल्प-३, ऋण व हमी, मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग (कार्यासन १४४४), मंत्रालय, मुंबई.
१५. उपसचिव नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. कक्ष अधिकारी नवि-४/नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ .
१७. रोख शाखा (नवि) (५ प्रती), मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती, नवि-७.

**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२१/प्र.क्र.१५३ /नवि-७, दिनांक: २१ मार्च, २०२३ चे सहपत्र**

**जोडपत्र-अ**

**मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांना मुंबई मेट्रो रेल्वे लाईन-४ (वडाळा-घाटकोपर-मुलुंड-ठाणे-कासारवडवली) या प्रकल्पासाठी सन २०२२-२३ मध्ये रु.३२.०० कोटीचे दुय्यम कर्ज सहाय्य वितरीत करण्याबाबत.**

| **अ.क्र.** | **विवरण** | **माहिती** |
|---|---|---|
| १. | संस्थेचे नांव | मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे(पूर्व), मुंबई-४०० ०५१ |
| २. | वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक व दिनांक | अनौपचारीक संदर्भ क्रमांक ९०/व्यय-३ दिनांक २०.०३.२०२३. |
| ३. | कर्जाची एकूण मंजूर रक्कम | रु.३६९३ कोटी |
| ४. | मंजूर कर्जापैकी यापूर्वी कर्जाची रक्कम वितरीत करण्यात आली असल्यास वितरीत करण्यात आलेली कर्जाची रक्कम | सन २०१८-१९ रु. २० कोटी<br>सन २०१९-२० रु. ४५ कोटी<br>सन २०२०-२१ रु. २२.५० कोटी<br>सन २०२१-२२ रु.४२ कोटी<br>सन २०२२-२३ रु. ४८ कोटी (माहे डिसेंबर, २०२२ अखेरपर्यंत) |
| ५. | मंजूर कर्जापैकी सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली कर्जाची रक्कम | **रु. ३२.०० कोटी** |
| ६. | एकापेक्षा अनेक सहकारी संस्था, व्यक्ती/यांना कर्ज मंजूर करण्यात आले असल्यास त्यांच्या नावासमोर, कर्ज मंजूरी रक्कम नमूद करण्यात यावी | - |
| ७. | एकूण कर्ज परतफेडीचे हप्ते | एका हप्त्यात |
| ८. | कर्ज परतफेडीचे हप्त्याची रक्कम | रु.३२.०० कोटी |
| ९. | कर्ज परतफेडीचे हप्त्याच्या कालावधी, जसे वार्षिक/सहामाही/त्रैमासिक इत्यादी | सदर प्रकल्पासाठी केफड्ब्ल्यु बँककडून घेण्यात आलेल्या मुख्य कर्जाची परतफेड माहे नोव्हेंबर, २०४० पर्यंत होणार आहे. तद्नंतर दुय्यम कर्जाची परतफेड सन २०४१ मध्ये सूरु होईल. सदर दुय्यम कर्जाची वसूली एका हप्त्यात होणे अपेक्षित आहे. |

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.03.21 19:28:22 +05'30'

**[विजय चौधरी]**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

| | | |
|---|---|---|
| १०. | कर्ज परतफेडीसाठी सवलतीचा कालावधी (Moratorium Period) | नाही |
| ११. | कर्ज परतफेडीसाठी हप्त्याच्या निश्चित केलेला कर्ज हप्त्याचा दिनांक | सन २०४५ |
| १२. | कर्ज परतफेडीच्या पहिल्या हप्त्याचा दिनांक | सन २०४५ |
| १३. | कर्ज परतफेडीच्या शेवटच्या हप्त्याचा दिनांक | सन २०४५ |
| १४. | व्याज दर | बिनव्याजी कर्ज |
| १५. | विलंब कालावधीसाठी दंडनीय व्याजदर व इतर आकार | लागू नाही. |
| १६. | व्याजाचा परतफेडीच्या हप्त्याचा कालावधी जसे वार्षिक/त्रैमासिक/सहामाही इत्यादी | लागू नाही |
| १७. | कर्जाच्या खर्चाकरीता लेखाशिर्ष | मागणी क्र. एफ-७ ६२१७-नगर विकासासाठी कर्जे ६०, इतर नगर विकास योजना १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे- राज्य योजना (००)(०१) मुंबई मेट्रो-४ रेल्वे प्रकल्पाकरिता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज ५५ कर्जे व आगाऊ रकमा सांकेतांक क्र. (६२१७०८१२) |
| १८. | कर्जाच्या वसूलीचे लेखाशिर्ष | नवीन लेखाशिर्ष घेण्यात येत आहे. |
| १९. | कर्जावरील व्याज/दंडनिय व्याज वसूलीचे लेखाशिर्ष | लागू नाही. |
| २०. | कर्जाशी संबंधित असलेल्या सहकारी संस्था यांचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | लागू नाही. |
| २१. | शासकिय कंपनीच्या नोडल ऑफीसचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | मुख्य लेखा अधिकारी<br>मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,<br>वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे(पूर्व), मुंबई. |
| २२. | डी. डी.ओ.चा नंबर | कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग,<br>मंत्रालय, मुंबई.<br>डी. डी.ओ. नंबर- ७१०१००२३०१ |

Vijay Karbhari Chaudhari
Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.03.21 19:27:59 +05'30'

**[विजय चौधरी]**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**